**सन २०१६-१७ च्या राज्य शिक्षक पुरस्कार सत्कार समारंभाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीटीसी-२०१७/प्र.क्र.७४/टीएनटी-४**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
तारीख:- ३ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक क्रमांकः क्र.पीटीसी-२०१३/प्र.क्र.(१२/१५)/टीएनटी-४, दि.१९/१/२०१५ व शुध्दीपत्र दि.२०/०१/२०१५
२) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी २०१६/प्र.क्र.९८/ टीएनटी-४, दि.२१.६.२०१६.
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.पीटीसी २०१६/प्र.क्र.९९/ टीएनटी-४,दि.१ ऑक्टोंबर,२०१६.
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांचे पत्र क्र.शिसं /राशिपु /समारंभ/ २०१७/विद्या शाखा/२७४१, दि. २० जुलै,२०१७. चे पत्र.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार राज्यातील शैक्षणिक क्षेत्रात उत्कृष्ट काम करणा-या शिक्षकांना दि.१५ ऑगस्ट,२०१७ रोजी"राज्य शिक्षक पुरस्कार"जाहिर करण्यात येणार आहेत.सन २०१६-१७ राज्य आदर्श शिक्षक पुरस्कारासंदर्भात संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये पुरस्कार प्रस्ताव निवडीबाबतचे निकष निर्गमित करण्यात आले असून राज्य आदर्श शिक्षक पुरस्कार प्रस्ताव ऑनलाईन प्राप्त झाले आहेत.शालेय शिक्षण विभागामार्फत सदर शिक्षकांना शासन स्तरावर दरवर्षी प्रमाणे दिनांक ५ सप्टेंबर,२०१७ रोजी शिक्षक दिनी पुरस्कार वितरण व सत्कार समारंभ आयोजित करण्यांत येणार आहे.या समारंभासाठी लागणा-या अंदाजित खर्चाचा प्रस्ताव शिक्षण संचालक,(माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी दिनांक २० जुलै,२०१७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आह.सदर पुरस्कार समारंभासाठी होणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांना राज्य पुरस्कार, सावित्रीबाई फुले पुरस्कार व आदिवासी क्षेत्रात उत्कृष्ठ काम करणा-या शिक्षकांना राज्य पुरस्कार या योजनेअंतर्गत सन २०१६-१७ करिता पुरस्कार देणे व त्यासाठी पुरस्कार वितरण समारंभ आयोजित करणे यासाठी अपेक्षित रु.१८१.५० लक्ष (रु. एक कोटी एक्क्याऐंशी लाख पन्नास हजार फक्त ) इतक्या खर्चास प्रशासकीय शासन मान्यता प्रदान करीत आहे.

२. यावरील खर्च खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ या वित्तीय वर्षामध्ये केलेल्या तरतूदीमधून खर्ची टाकण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष व मागणी क्रमांक | मंजूर तरतूद रु.लक्ष |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | "२२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण ८०० इतर खर्च(०२)(०१) संकिर्ण (२२०२ २२९२) प्राथमिक,माध्यमिक शिक्षकांना राज्य पुरस्कार,मागणी क्रमांक ई-२" | १७३.०० |
| २ | "२२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण (०२)(४६) अदिवासी क्षेत्रामध्ये उकृष्ट काम करणाऱ्या शिक्षकांना राज्यपुरस्कार संकिर्ण (२२०२ ३६८२) ३१ सहाय्यक अनुदाने,मागणी क्रमांक ई-२" | ४.५० |
| ३ | "२२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण ८०० इतर खर्च (०२)(०३) आदर्श स्त्री शिक्षिका पुरस्कार (२२०२ २८८२)" | ४.०० |
| | **एकूण :-** | १८१.५० |

३. सदर मान्यता वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,भाग पहिला,उपविभाग ३ अनुक्रमांक ४, २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०८०३१६१५१२२२२१ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila D Chaudhari

Digitally signed by Charushila D Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila D Chaudhari
Date: 2017.08.09 17:01:34 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य,पुणे
२) शिक्षण संचालक, (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे

३) शिक्षण संचालक, (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
४) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई /नागपूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६) कार्यासन अधिकारी, (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
७) वित्त विभाग, व्यय - ५ / विनियम
८) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक
९) प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहाय्यक
१०) निवडनस्ती-टिएनटी-४